**मंत्रालय मुख्य इमारतीतील उपाहारगृहासाठी लागणारे फर्निचर खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**

**शासन निर्णय क्रमांक- आस्था २०१८/प्र.क्र.३१५/१८/मंउका,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक- ०२ नोव्हेंबर, २०१८

**प्रस्तावना :**

मंत्रालय मुख्य इमारतीतील उपाहारगृहाचे नुतनीकरणाचे काम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येत आहे. मंत्रालय उपाहारगृहात पुर्वी लोखंडी फ्रेमवर प्लायवुड वापरलेल्या टेबल व खुर्च्या वापरात होत्या. सदर टेबल व खुर्च्या जुन्या झाल्या असून त्यामध्ये झुरळ व इतर किटक होत असल्याने त्यावर वारंवार किटकनाशक फवारणी करावी लागत होती. त्यामुळे नुतनीकरणामध्ये उपाहारगृहातील सर्व टेबल व खुर्च्या काढून टाकून त्याऐवजी स्टेनलेस स्टीलचे टेबल व खुर्च्या तसेच अधिकारी कक्षासाठी सागवानी लाकडाच्या टेबल व खुर्च्या वापरण्याचे ठरविण्यात आले. त्यानुषंगाने कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, यांचेकडून अंदाजपत्रक मागविण्यात आले होते. नवीन टेबल व खुर्च्यांसाठी येणाऱ्या खर्चाबाबतचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, यांचेकडून प्राप्त झाले आहे. सदर अंदाजपत्रकास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय मुख्य इमारतीतील उपाहारगृहामध्ये कर्मचारी भोजन कक्षासाठी स्टेनलेस स्टीलचे टेबल व खुर्च्या तसेच अधिकारी कक्षासाठी सागवानी लाकडाच्या टेबल व खुर्च्या तसेच इतर फर्निचर खरेदी करण्यासाठी रुपये ५१,४८,२३५/- (रुपये एकावन्न लक्ष अठ्ठेचाळीस हजार दोनशे पस्तीस फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांनी दरसुचीबाह्य दरांना संबंधित अधीक्षक अभियंता यांची मंजुरी घेण्याची कार्यवाही करावी तसेच मान्यता किंमतीत काम पुर्ण करण्याची दक्षता घ्यावी. तसेच खरेदी प्रक्रिया उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १/१२/२०१६ च्या शासन निर्णय सोबतच्या खरेदी पुस्तिकेनुसार करण्यात यावी.

३. सदर कामाचा खर्च सन २०१८-१९ साठी मंत्रालय उपाहारगृहासाठी लेखाशीर्ष २०७५ संकीर्ण सर्वसाधारण सेवा, १०८-उपाहारगृह भांडार विभाग, (००)(०१) मंत्रालय उपाहारगृह (२०७५ ०१३१), १३-कार्यालयीन खर्च याखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदरचा खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून महाव्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे यांना घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७८/व्यय-४, दिनांक २३/१०/२०१८ अन्वये व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक२२८४/इमा-३, दिनांक१/१०/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका१९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक-३७, नियम क्रमांक ९० नुसार प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११०२१७५४२४४८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**,**

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2018.11.02 18:00:25 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**सह सचिव (उपाहारगृहे)**
**महाराष्ट्र शासन**

प्रति**,**

१) वित्त विभाग, व्यय-४/अर्थसंकल्प-१४, मंत्रालय, मुंबई
२) महालेखाकार-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मर्झबान रोड, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई,
६) कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई
७) उपअभियंता, दक्षिण (सा.बां.) उपविभाग, मुंबई
८) कक्ष अधिकारी (इमारती-३), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) वरिष्ठ व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृहे,
१०) सहायक लेखा अधिकारी, मंत्रालय उपाहारगृहे कार्यालय
११) सहायक लेखा परीक्षा अधिकारी, मंत्रालय उपाहारगृहे कार्यालय
१२) निवडनस्ती.